सन २०२२-२३ करिता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी रु.२६५.५४ कोटी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नादेकृ ४६२२/प्र.क्र.७८/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - २० मे, २०२२

**संदर्भ:-**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि. १७ जानेवारी, २०१८

२. नानाजी देशमुख कृषि संजिवनी प्रकल्प कार्यालयाचे पत्र क्र.नादेकृसंप्र०९२१/अंदाजपत्र/ प्र.क्र.१२२/२०२१/१६७, दिनांक २० एप्रिल, २०२२

**प्रस्तावना:-**

हवामान बदलास अतिसंवेदनशील असलेल्या विदर्भ व मराठवाड्यातील ४२१० गावे तसेच विदर्भातील पूर्णा नदीच्या खो-यातील खारपाण पट्ट्यातील ९३२ गावे अशा एकूण ५१४२ गावांमध्ये ६ वर्ष कालावधीत जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने सुमारे रू. ४००० कोटी अंदाजित खर्चाचा नानाजी देशमुख कृषि संजिवनी प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत निवडलेल्या गावांमध्ये आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये पूर्ण झालेल्या कामांच्या बाबींची देयके अदा करण्याकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांचेकडून संदर्भ क्रमांक २ च्या पत्रांन्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून रु.२६५.५४ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :**

१. सन २०२२-२३ करिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना रु. २६५.५४ कोटी (रु. दोनशे पासष्ट कोटी चोपन्न लाख फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असून सदर निधीपैकी बाहय हिश्श्याच्या व राज्य हिश्श्याच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे:-

**(रु. कोटीत)**

| बाहय हिश्श्याचा निधी (७०%) | राज्य हिश्श्याचा निधी (३०%) | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|
| १८५.४० | ८०.१४ | २६५.५४ |

२. परिच्छेद क्रमांक १ येथील तक्त्यात नमूद केल्यानुसार नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता बाहय हिश्श्याचा रु. १८५.४० कोटी (रु.एकशे पंच्याऐंशी कोटी चाळीस लाख फक्त) निधी वितरीत करण्यात येत असून तो प्रकल्पाच्या बाहय हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक डी-३,

२४०१ पीक संवर्धन,

(११५) लहान /सिमांत शेतक-यांची आणि शेतमजुरांची योजना,

(००) (०२) हवामान अनुकूल कृषि प्रकल्प, (बाहय हिस्सा ७०%) (२४०१ A६४६)

३३-अर्थसहाय्य

३. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता राज्य हिश्श्याचा रु.८०.१४ कोटी (रुपये ऐंशी कोटी चौदा लाख फक्त) निधी बाब निहाय वितरीत करण्यात येत असून त्याचा तपशील पुढीलप्रमाणे :-

| बाब | वितरीत निधी (रुपये कोटीत) |
|---|---|
| ०१-वेतन | ७.२० |
| ०६-दुरध्वनी, वीज व पाणी देयक | ०.०५ |
| १०-कंत्राटी सेवा | १२.६० |
| ११ -देशांतर्गत प्रवास खर्च | ०.४५ |
| १२- विदेश प्रवास खर्च | ०.१२ |
| १३-कार्यालयीन खर्च | १.८० |
| १४- भाडेपट्टी व कर | ०.९६ |
| १७- संगणक खर्च | ०.६० |
| २६-जाहिरात व प्रसिध्दी | १.२० |
| २८- व्यावसायिक सेवा | ६.०० |
| ३०- इतर कंत्राटी सेवा | ०.०६ |
| ३३- अर्थसहाय्य | ४९.०७ |
| ५०- इतर खर्च | ०.०३ |
| **एकूण** | **८०.१४** |

सदर रु. ८०.१४ कोटी (रुपये ऐंशी कोटी चौदा लाख फक्त) निधी प्रकल्पाच्या राज्य हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक डी-३,

२४०१ पीक संवर्धन,

(११५) लहान /सिमांत शेतक-यांची आणि शेतमजुरांची योजना,

(००) (०३) हवामान अनुकूल कृषि प्रकल्प, (राज्य हिस्सा ३०%) (२४०१ A६५५)

०१-वेतन
०६-दुरध्वनी, वीज व पाणी देयक
१०-कंत्राटी सेवा
११ -देशांतर्गत प्रवास खर्च
१२- विदेश प्रवास खर्च
१३-कार्यालयीन खर्च
१४- भाडेपट्टी व कर
१७- संगणक खर्च
२६-जाहिरात व प्रसिध्दी
२८- व्यावसायिक सेवा
३०- इतर कंत्राटी सेवा
३३- अर्थसहाय्य
५०- इतर खर्च

४. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या रु.२६५.५४ कोटी (रु. दोनशे पासष्ट कोटी चोपन्न लाख फक्त) निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा प्रथम प्राधान्याने मागील आर्थिक वर्षातील शेतकऱ्यांची प्रलंबित देयके व सामुदायिक कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी विनियोग करण्यात यावा तसेच प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांनी ३३-अर्थसहाय्य या उद्दिष्टशीर्षाखाली खर्च झालेल्या रकमांचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे.

६. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची जागतिक बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

७. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत झालेल्या कामाचा प्रगती अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५६/२०२२/व्यय-१, दि. ०६ मे,२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५२०१३०७००६४०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.05.23 17:30:50 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजिवनी प्रकल्प, मुंबई
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अ नुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१३. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय -१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन २-अे कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई
१६. मा.मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती.